**जलस्वराज्य-2 कार्यक्रमातील कार्यरत राज्य स्तरावरील अधिकारी / कर्मचारी यांना भ्रमण दूरध्वनी भत्ता मंजूर करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जस्वका-2/2014/प्र.क्र.21/पापु-11

7 वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
नविन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-400 032,
दिनांक: 27/10/2014

वाचा :

**1) शासन निर्णय क्रमांक जस्वप्र-2011/प्र.क्र.118/पापु-11, दिनांक 01 फेब्रुवारी,2012.**
**2)शासन निर्णय क्रमांक जस्वप्र-1213/प्र.क्र.200/पापु-11,दिनांक 04 जानेवारी,2014.**
**3) शासन निर्णय क्रमांक जस्वप्र-0114/प्र.क्र.05/पापु-11, दिनांक 06 फेब्रुवारी,2014.**
**4) शासन निर्णय क्रमांक जस्वप्र-0114/प्र.क्र.20/पापु-11, दिनांक 13 जून,2014.**

प्रस्तावना:

जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने राज्यातील ग्रामीण भागात मागणी आधारीत व लोकसहभाग तत्वावर जलस्वराज्य -2 कार्यक्रम राबविण्याचे निश्चित झाले आहे. दिनांक 20.11.2013 रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये जलस्वराज्य-2 कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी मान्यता देण्यात आली आहे.

राज्यस्तरावरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील अधिकारी/कर्मचारी वारंवार दौऱ्यावर जात असल्याने त्यांच्याशी निगडीत विषयाबाबतची तातडीची माहिती उपलब्ध होण्यासाठी संपर्काचे साधन म्हणून जलस्वराज्य-2 कार्यक्रमासाठी कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांना भ्रमणदूरध्वनी सेवा उपलब्ध करुन देण्याचा निर्णय दिनांक 01.02.2012 च्या शासन निर्णय अन्वये घेण्यात आला होता. त्यानुसार भ्रमणदूरध्वनी सेवेपोटी प्रत्यक्ष देयकानुसार तथापि दरमहा रु.1000/- या कमाल मर्यादेपर्यंतच्या देयकाच्या रकमेची प्रतिपूर्ती करण्याची तरतूद करण्यात आली होती.

आता शक्तीप्रदान समितीच्या दिनांक 18.03.2014 रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार जलस्वराज्य-2 कार्यक्रमांतर्गत सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाअन्वये कार्यरत असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना भ्रमणदूरध्वनी व V-DATA Card आवश्यकतेनुसार मंजूर करण्याचे अधिकार उप सचिव तथा प्रकल्प संचालक यांना प्रदानित करण्यात आलेले आहेत. त्यानुसार

दि.13.06.2014 च्या शासन निर्णयासाठी त्याचा समावेश करण्यात आला आहे. तथापि, सदर उल्लेख अत्यंत त्रोटक स्वरुपाचा असून त्याबाबत स्पष्टीकरणात्मक आदेश नव्याने निर्गमित होणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने भ्रमणदूरध्वनी भत्ता मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यामुळे खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहेत.

## शासन निर्णय :-

राज्यस्तरावरील जलस्वराज्य-2 कार्यक्रमातंर्गत सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षामध्ये कार्यरत अधिकारी/कर्मचारी कंत्राटी तज्ञ/कर्मचारी यांना भ्रमणदूरध्वनी सेवेसाठी आलेल्या प्रत्यक्ष खर्चाचा विचार न करता त्यांचेवर सोविलेल्या कामकाजाच्या जबाबदारीनुसार या शासननिर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये त्यांचे पदनामासमोर स्तंभ क्रमांक-4 मध्ये दर्शविण्यात आलेली रक्कम दरमहा अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक चवक-1013/प्र.क्र.17/सेवा-3,दिनांक 10 जुलै,2013 अन्वये मंत्रालयीन विभागातील सहसचिव, उपसचिव यांना निवासी दूरध्वनी, इंटरनेट (निवासी व मोबाईल) व इतर सुविधावरिल खर्च भागाविण्यासाठी त्यांच्या पदाच्या ग्रेड वेतनाएवढी रक्कम एकत्रित ठोक भरपाई मंजुर करण्यात आलेली आहे. तथापि, जलस्वराज्य-2 कार्यक्रमाचा आढावा घेणे व अनुषंगिक अतिरिक्त कामे करावी लागणार असल्यामूळे उपसचिव तथा प्रकल्प संचालक व प्रकल्प व्यवस्थापक यांनाही सोबतच्या परिशिष्टातील स्तंभ क्र. 4 मध्ये नमुद केलेली रक्कम दरमहा अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

राज्यस्तरावरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील अधिकारी/कर्मचारी/तज्ञ तथा कंत्राटी तज्ञ/कर्मचारी यांना अदा करावयाच्या भ्रमणदूरध्वनी भत्त्यावर होणारा खर्च उपसचिव तथा प्रकल्प संचालक (सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष) यांच्या नावे स्टेट बँक ऑफ इंडिया, शाखा कोकण भवन, नवी मुंबई येथे उघडण्यात आलेले खाते क्रमांक 31868434781 तसेच भारतीय रिझर्व्ह बँकेत उघडण्यात आलेल्या स्वियं प्रपंजी खाते क्रमांक 6184350010 मध्ये जमा असलेल्या रकमेमधून आवर्ती खर्च, कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदरहू भ्रमणध्वनी भत्ता उपरोक्त संदर्भांकित क्र.2, 3 व 4 च्या शासन निर्णयान्वये व शक्तीप्रदान समितीच्या दिनांक 18.03.2014 रोजी संपन्न झालेल्या 56 व्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

तसेच राज्य स्तरावरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील अधिकारी / कर्मचारी/ कंत्राटी कर्मचारी यांना भ्रमणदूरध्वनी भत्ता अदा करण्याबाबत यापूर्वी निर्गमित करण्यात आलेले सर्व शासन निर्णय / आदेश निष्प्रभावित करण्यात येत आहेत. सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे भ्रमणदूरध्वनी भत्ता अदा करण्याबाबतचे सदर आदेश हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या महिन्यापासून अंमलात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक **201410301108482828** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2014.10.30 16:57:25 +05'30'

(अजय सावरीकर)
उप सचिव तथा प्रकल्प संचालक

प्रत,

1 महालेखापाल, महाराष्ट्र मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
2 अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
3 निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
4 उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सुसप्रव्यक),पापुवस्ववि,मंत्रालय,मुंबई.
5 प्रकल्प व्यवस्थापक (सुसप्रव्यक),पापुवस्ववि,सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
6 उप सचिव (आस्थापना), पापुवस्ववि, मंत्रालय, मुंबई.
7 प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक.
8 प्रधान सचिव, पापुवस्ववि, मंत्रालय,मुंबई यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक.
9 प्रधान सचिव, नियोजन विभग, मंत्रालय, मुंबई यांचे वरीष्ठ
9 प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक.

10 सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक.

11 सचिव (ग्राम विकास व पंचायत राज), ग्राम विकास विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक .

12 सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक.

13 सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकारण, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.

14 वरीष्ठ लेखा अधिकारी (सुसप्रव्यक), पापुवस्ववि, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

15 रोख शाखा (सुसप्रव्यक)पापुवस्ववि, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

16 निवड नस्ती, पा.पु.-11.

जलस्वराज्य-**2** कार्यक्रमासाठी राज्यस्तरावर निर्माण करण्यात आलेल्या पदांना भ्रमणदूरध्वनी भत्ता मंजूर करण्याबाबतचे परिशिष्ठ-

| अ.क्र. | अधिकारी /कर्मचारी यांचे पदनाम | मंजूर पदे | अनुज्ञेय भ्रमणदूरध्वनी भत्ता रक्कम (रुपये ) |
|---|---|---|---|
| **1** | **2** | **3** | **4** |
| 1 | **उपसचिव तथा प्रकल्प संचालक** | **1** | **2000.00** |
| 2 | **प्रकल्प व्यवस्थापक** | **1** | **2000.00** |
| 3 | अवर सचिव | 1 | 1000.00 |
| 4 | क्षमता बांधणी तज्ञ | 1 | 1000.00 |
| 5 | वित्त नियंत्रक | 1 | 1000.00 |
| 6 | अधिक्षक अभियंता | 1 | 1000.00 |
| 7 | कार्यकारी अभियंता | 2 | 1000.00 |
| 8 | उप अभियंता | 2 | 1000.00 |
| 9 | वरिष्ठ लेखा अधिकारी | 1 | 1000.00 |
| 10 | तांत्रिक अधिकारी | 1 | 1000.00 |
| 11 | जल भू-वैज्ञानिक | 1 | 1000.00 |
| 12 | कक्ष अधिकारी | 1 | 1000.00 |
| 13 | सहाय्यक लेखा अधिकारी | 3 | 750.00 |
| 14 | संनियंत्रण् व मूल्यमापन तज्ञ | 1 | 750.00 |
| 15 | सहाय्यक संनियंत्रण् व मूल्यमापन तज्ञ | 2 | 500.00 |
| 16 | कनिष्ठ / शाखा अभियंता | 3 | 500.00 |
| 17 | सहाय्यक | 1 | 500.00 |
| 18 | उपलेखापाल | 1 | 500.00 |
| 19 | लिपीक (रोखपाल) | 1 | 300.00 |
| 20 | लिपीक-टंकलेखक | 2 | 300.00 |
| 21 | लघुलेखक | 2 | 500.00 |
| 22 | वाहन चालक नि सर्वसाधारण सहाय्यक | 2 | 300.00 |
| 23 | संपादणूक तज्ञ | 1 | 750.00 |
| 24 | वित्तीय तज्ञ | 1 | 750.00 |
| 25 | पर्यावरण तज्ञ | 1 | 750.00 |
| 26 | ज्ञान व्यवस्थापन तज्ञ | 1 | 750.00 |
| 27 | समाज व्यवस्थापन तज्ञ | 1 | 750.00 |
| 28 | व्यवस्थापन माहिती प्रणाली तज्ञ | 1 | 750.00 |
| 29 | माहिती तंत्रज्ञान तज्ञ | 1 | 750.00 |
| 30 | लेखा सहाय्यक | 1 | 500.00 |
| 31 | सहाय्यक व्यवस्थापन माहिती प्रणाली तज्ञ | 1 | 500.00 |
| 32 | सहाय्यक माहिती शिक्षण व संवाद तज्ञ | 1 | 500.00 |

| | | | |
|---|---|---|---|
| 33 | सहाय्यक क्षमता बांधणी तज्ञ | 1 | 500.00 |
| 34 | शिपाई | 3 | 250.00 |
| 35 | निम्न व्यवसायी (डेटा एन्ट्री ऑपरेटर) | 12 | 300.00 |
| | | 58 | |

*टिप :- जलस्वराज्य-**2** कार्यक्रमासाठी निर्माण करण्यात आलेल्या कंत्राटी तज्ञ पदांवर प्रतिनियुक्तीने पदस्थापना झाल्यास त्या तज्ञांना रु.**1000/-** भ्रमणदूरध्वनी भत्ता अनुज्ञेय राहील. तथापि, कंत्राटी तत्वावर पदस्थापना झालेल्या तज्ञांना सदर भत्ता रक्कम रुपये **750/-** अनुज्ञेय करण्यात यावा.*